<u>राज्यक्षेत्रातील योजना</u>

**करकंब पाणी पुरवठा योजना ता. पंढरपूर जि. सोलापूर राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता**

**महाराष्ट्र शासन**
**पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग,**
**शासन निर्णय क्र.पापुयो-२३१०/प्र.क्र. ७६/पापु-१७**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक : १९.०७.२०१०**

**वाचा:-**

१. शासन निर्णय क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र. १०४(अ) पापु-०७, दि. १७.३.२०१०
२. शासन पत्र क्र. पापुयो २३१०/प्र.क्र. ७६/पापु १७, दि. २०.४.२०१०
३. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई यांचे पत्र क्र.मजीप्रा/मनिसंवसंकक्ष/ग्रामीण/२४२ दि. ५.५.२०१०.

**प्रस्तावना:-**

करकंब ता. पंढरपूर जि. सोलापूर पाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव ग्रामपंचायत करकंब यांच्या मागणी नुसार तयार करुन शासनास सादर करण्यांत आला होता. त्यास शासनाच्या दिनांक १७.३.२०१० च्या शासन निर्णयानुसार निर्गमित करणेंत आलेल्या सुचनांच्या तसेच सदर प्रस्तावास मा. सदस्य सचिव, मुंबई यांची तांत्रिक मान्यता घेणे या अटींच्या अधीन राहून प्रस्ताव शासनास सादर करणेच्या सूचना दि.२०.४.२०१० च्या पत्रानुसार निर्गमित करणेत आल्या होत्या. ग्रामपंचायत करकंब यांनी त्यांचे दिनांक २६.७.२००९ च्या ग्राम सभेत मंजूर केलेल्या दि. ११.८.२००९ च्या पत्रान्वये प्राप्त ठरावानुसार " **राष्ट्रीय ग्रामीण पेय जल कार्यक्रमांतर्गत** " करकंब गावासाठी स्वतंत्र नळपाणी पुरवठा योजनेचा प्रस्ताव शासनास सादर केलेला आहे. प्रस्तुत प्रस्तावास " **राष्ट्रीय ग्रामीण पेय जल कार्यक्रमांतर्गत** " प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

<u>**शासन निर्णय:-**</u>

१) वरील प्रस्तावनेस अनुसरुन करकंब गावासाठी ( ता.पंढरपूर, जि सोलापूर ) पाणी पुरवठा योजनेच्या **रुपये** रु.११,४८,४६००० (रुपये अकरा कोटी अठ्ठेचाळीस लक्ष सेचाळीस हजार फक्त) इतक्या ढोबळ किंमतीच्या अंदाजपत्रकास व आराखडयास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२) **करकंब पाणी पुरवठा योजनेचा वित्तीय आकृतीबंध खालील प्रमाणे राहील:**

| | |
|---|---|
| **योजनेची ढोबळ किंमत** | **रु. ११,४८,४६,०००/-** |
| **शासकीय अनुदान (९० टक्के)** | **रु. १०,३३,६१,४००/-** |
| **लोकवर्गणीचा हिस्सा (१० टक्के)** | **रु. १,१४,८४,६००/-** |

३) सदर योजनेस खालील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. सदर योजनेची अंमलबजावणी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत ग्रामपंचायत / ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समितीच्या नियंत्रणाखाली करण्यात येईल. योजना पुर्ण झाल्यानंतर ती यशस्वीरित्या पूर्ण झालेली आहे, हे पडताळण्यासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने संबंधीत ठेकेदारांशी करार नामा करताना त्यामध्ये ही अट घालावी की, योजना पुर्ण झाल्यानंतर ठेकेदार किमान एक वर्ष ही योजना चालवेल. त्यानंतर योजनेची देखभाल दुरुस्ती ग्रामपंचायत/ ग्राम पाणी पुरवठा व स्वच्छता समिती करेल.

२. सदर योजनेच्या लोकवर्गणीचे ग्रामपंचायत करकंब यांनी भरावी. लोकवर्गणी भरण्याबाबतचा ठराव ग्रामपंचायतीकडून घेतल्यानंतर लोकवर्गणी प्राप्त झाल्यानंतर योजनेच्या कामास सुरवात करावी.

३. योजना चालविण्यासाठी व देखभाल दुरुस्तीसाठी येणारा खर्च भागविण्याकरिता संबंधीत ग्रामपंचायतीने योग्य ती पाणीपट्टी निश्चित करावी. सदर निधी योजना कार्यान्वित झ्ााल्यापासून एक वर्ष ग्रामपंचायती ने महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाकडे वर्ग करणे आवश्यक राहील. त्यासाठी शासनातर्फे अनुदान देण्यात येणार नाही.

४. योजनेचे स्त्रोत बळकटीकरण करण्यात यावी. तसेच योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

५. संपूर्ण गाव हागंणदारी मुक्त करण्यात यावे.

६. कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

७. दरडोई खर्चाचे निकषात योजना नसल्यामुळे कोणत्याही परिस्थितीत योजनेचे काम मंजूर किंमतीतच पुर्ण करावे. त्यासाठी कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने कार्यवाही करावी.

८. जलसपंदा विभागाची पाणी उचलण्याची परवानगी / आरक्षण प्राप्त झाल्याशिवाय योजनेचे काम सुरु करु नये.

९. योजनेअंतर्गत आवश्यक क्षमतेचा साठवण तलाव बांधावयाचा आहे. त्यासाठी जागा प्राप्त झाल्या शिवाय योजनेतील कामाच्या निविदा काढू नये व काम सुरु करु नये.

१०. योजनेतील कामे टप्प्या-टप्प्याने करावी. उद्भव विकसीत झाल्याशिवाय इतर कामे करु नयेत.

११. जास्त किंमतीच्या निविदा स्वीकृत करण्यापुर्वी तसेच मंजूर दरापेक्षा जास्त दराने साहित्य (उदा. पाईप्स) घेण्यापुर्वी शासनाची परवानगी घ्यावी.

१२. योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाच्या / जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे दयावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

१३. योजनेतील टप्पा-२ व टप्पा-३ ची कामे सुरु करण्यापुर्वी शासनाची परवानगी घ्यावी.

१४. सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची तसेच दि. १७.३.२०१० च्या शासन निर्णयातील अटींची पुर्तता करण्यात यावी.

४)	या योजनेवर होणारा खर्च मागणी क्र. "**वाय- २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता ०१, पाणी पुरवठा- १०२, ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम (बी) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने (०१) (डब्युएस-६) (राज्यक्षेत्र)** " या पाणी पुरवठा योजनांसाठी ग्रामपंचायती/जिल्हा परिषदांना अनुदाने (२२१५ १२१७) या लेखा शिर्षाखालील उपलब्ध तरतुदी मधून भागविण्यात यावा.

५)	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक **२०१००७१९१५५७५९००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(र. सु. शेटये)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
१) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
३) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर
५) जिल्हाधिकारी, सोलापूर
६) अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, सांगली
७) अधिक्षक अभियंता, मध्यवर्ती नियोजन संकल्पचित्र व सनियंत्रण कक्ष,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,नवी मुंबई४००६१४
८) वित्तिय सल्लागार व मुख्यलेखा अधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, बेलापूर, नवी मुंबई
९) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, सोलापूर
१०) संचालक भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पीएमटी बिल्डींग स्वारगेट, पुणे
११) उपसंचालक भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
१२) वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
१३) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/परीक्षण, महाराष्ट्र १, मुंबई
१४) महालेखापाल, लेखा व अनुज्ञेयता/परीक्षण, महाराष्ट्र २, नागपूर
१५) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
१८) मा.मंत्री (पा.पु.व स्व.), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१९) मा.राज्यमंत्री (पा.पु.व स्व.) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय, मुंबई
२०) प्रधान सचिव (पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
२१) मु.अ. तथा विशेष कार्य अधिकारी (पाणीपुरवठा व स्वच्छता विभाग) यांचे स्वीय सहायक
२२) कार्यासन पापु ०४, ०५, ०६, ०९, १३, १८, संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
२३) निवड नस्ती, पापु-१७, पा.पु.व स्व. वि. मंत्रालय, मुंबई

**------*********-----------**

**<u>ग्रामविकास व जलसंधारण विभाग</u>**

## भारताचे नियंत्रक महालेखापरीक्षक यांचा सन २००६-०७ चा स्थानिक स्वराज्य संस्थांचा वार्षिक अहवाल

| अ. क्र | प्रकरण क्रमांक | पृष्ठ क्रमांक | परिच्छेद क्रमांक | परिच्छोचा विषय (शिफारशी) | अभिप्राय |
|---|---|---|---|---|---|
| | | | | | |
| | | | | | |